महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ आणि संलग्नित महाविद्यालय व इतर संस्थामधील शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक DAHD-१२०११/१२/२०२३-AH२ (६६८३४८)**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२**
**दिनांक :- १४ फेब्रुवारी, २०२५**

**वाचा :** १) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक कृषिवि २००१/ प्र.क्र. ८४/२० ओ, दिनांक २ जुलै, २००१

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-वेतन ११९९/प्र.क्र.२/९९/सेवा-३, दि.२० जुलै, २००१

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक, वेतन ११०९/प्र.क्र.४३/सेवा-३, दि. ३१ ऑगस्ट, २००९

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन ११०९/प्र.क्र.४४/सेवा-३, दि.०१ एप्रिल, २०१०

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन ११०९/प्र.क्र.४१/सेवा-३, दि.०५ जुलै, २०१०

६) शासन शुद्धीपत्रक वित्त विभाग, क्रमांकः वेतन ११०९/प्र.क्र.१/सेवा-३, दिनांक २१ मे २०१०

७) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक मपवि २००९/प्र.क्र. ४४४/०९/पदुम-१ (अ), दिनांक ६ जुलै, २०१०.

८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन १०१४/प्र.क्र.२१/सेवा-३, दि.०६ सप्टेंबर, २०१४

९) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक याचिका-१०१२/प्र.क्र.७४/सेवा ३, दि. ३ मार्च, २०१६

१०) शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, क्रमांक. मपवि-२०१३/प्र.क्र.१९/म्हापसू, दिनांक २८ सप्टेंबर, २०१८

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर ची स्थापना सन २००० मध्ये करण्यात आली असून संदर्भाधीन क्र. १ येथील दिनांक २ जुलै, २००१ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील कृषि विद्यापीठातील तत्कालीन पशुवैद्यकीय, दुग्धतंत्रज्ञान व मत्स्य विज्ञान महाविद्यालये / संस्था/प्रक्षेत्रे येथील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी पदांसह महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाकडे हस्तांतरीत करण्यात आले आहे.

२. राज्य शासकीय व जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांना लागू असलेली कालबध्द पदोन्नती योजना बंद करुन त्याऐवजी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील दिनांक २० जुलै २००१ च्या शासन निर्णयान्वये सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू केलेली होती. त्यानुसार संदर्भाधीन क्र. १० येथील दिनांक २८ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ आणि संलग्नित महविद्यालय व इतर संस्थामधील शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना विद्यापीठ स्थापनेपासून सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्यात आलेली आहे.

३. राज्य शासकीय व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतनश्रेणीत सुधारणा करण्यासंबंधी शिफारशी करण्यासाठी नेमलेल्या राज्य वेतन सुधारणा समिती, २००८ ने आपल्या अहवालात राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबतही शिफारस केली होती. त्या शिफारशींचा विचार करुन

राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना वित्त विभाग संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. १ एप्रिल, २०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये "सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना" लागू करण्यात आली होती.

४. सदर "सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना" महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ आणि त्यांच्या नियंत्रणाखालील महविद्यालय व इतर संस्थामधील शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

५. महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ आणि संलग्नित महविद्यालय व इतर संस्थामधील शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध नसल्याने असलेली कुंठितता घालविण्यासाठी संबंधित पद धारकांना १२ वर्षाच्या नियमित सेवेनंतर त्यांच्या पदोन्नती साखळीतील वरच्या पदावरील वेतनश्रेणी देण्याची सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना सुधारित करून, कृषि विद्यापीठे व उच्च व तंत्र शिक्षण विभागाला मान्यता दिल्याप्रमाणे २ लाभांची "सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना" लागू करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ आणि संलग्नित महविद्यालय व इतर संस्थामधील शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना "सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना" लागू करताना वित्त विभागाच्या शासन निर्णय, दि.१ एप्रिल, २०१०, दि.५ जुलै, २०१० व दि. ६ सप्टेंबर, २०१४ मधील सर्व तरतूदी पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्यात येत आहेत.

७. सदरील "सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना" अंतर्गत येणारा खर्च हा महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठाला उपलब्ध करून देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. तथापि, सदर कर्मचाऱ्यांना प्रत्यक्ष लाभ अदा करण्यापूर्वी आवश्यक त्या कार्यपध्दतीचा अवलंब करावा. तसेच सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेणे आवश्यक आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५२७/२०२४/व्ययर२, दि. २०/१२/२०२४ आणि क्र. १६६/२०२४/आपुक, दिनांक ०६/०८/२०२४ अन्वये मिळालेल्या सहमती नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१४११४०३७०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2025.02.14 11:41:19 +05'30'

**(नि.भा.मराळे)**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. कुलपती व राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई

२) मा. कुलगुरु, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
३) कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
४) नियंत्रक, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८) वित्त विभाग (सेवा ३)
९) निवड नस्ती